शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा १०० % वापर करण्याबाबत.

---

६७५

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:मभावा-१०९४/५५१/प्र.क्र.३७/९४/२०-ब,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १९ ऑगस्ट, १९९४.

परिपत्रक

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४ च्या तरतुदीनुसार दिनांक १ मे १९६६ पासून वर्जित प्रयोजने वगळता अन्य सर्व शासकीय कामकाज मराठीतून करणेबाबत व त्याची अंमलबजावणी काटेकोरपणे करणे विषयी शासनाने वेळोवेळी परिपत्रके काढून मार्गदर्शन केलेले आहे. शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा १०० % वापर व्हावा या संबंधात शासकीय कार्यालयांची तपासणी करण्याचे काम भाषा संचालक यांजकडे सोपविण्यात आले आहे. तपासणी पथकाने शासनाच्या असे निदर्शनास आणून दिले आहे की, शासकीय कार्यालयांमार्फत मराठी भाषेमध्ये सादर केलेली देयके संबंधित कोषागार कार्यालये, आक्षेप घेऊन परत करतात. या संबंधात महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ (खंड एक) मधील नियम १५३ (दोन) प्रमाणे "प्रादेशिक भाषेत (मराठी) बील पाठविणाऱ्या अधिकाऱ्याच्या सहीने बिलासंबंधीचा तपशीलवार गोषवारा इंग्रजीत पृष्ठांकित करण्यात येईल." असे जरी नमूद केले असले तरी त्याखालील टी-२ प्रमाणे "बिले जेव्हा प्रादेशिक भाषांमध्ये उदा. मराठीमध्ये तयार केली जातात, तेव्हा त्यामध्ये फक्त आंतरराष्ट्रीय आकडे लिहले आहेत" या शर्तीच्या अधीनतेने, इंग्रजीत गोषवारा पृष्ठांकित करण्याची आवश्यकता नसेल" असे स्पष्ट नमूद केले आहे. म्हणजेच मराठीत सादर केलेल्या देयकात देयकाचा तपशिलवार गोषवारा इंग्रजीत देण्याची आवश्यकता नाही याकडे अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, सर्व कोषागार/उप कोषागार कार्यालये व महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांचे लक्ष वेधण्यात येत आहे.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९६/९४/कोषा-४, दिनांक १७ ऑगस्ट, १९९४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ.व.आम्बेरकर,
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

सर्व मंत्रालयीन विभाग व कार्यालयप्रमुख यांच्या माहितीसाठी.